सन २०१८-१९ शालेय क्रीडा स्पर्धाआयोजनाकरिता निधी वितरण.

.

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांक : निविप्र ४०१८ /प्र.क्र.१०५ /क्रीयुसे -२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : १६ ऑगस्ट, २०१८.

**वाचा:-**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. राक्रीधो २०१२/प्र. क्र. १८२/क्रीयुसे-२, दि.२४.१२.२०१४.
२. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं - २०१८ / प्र.क्र ६९ / अर्थसं-३ ,दि.०२.०४.२०१८.
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचे पत्र क्र.क्रीयुसे/शाक्रीस्पआ/निवि/२०१८-१९/६/का४, दि. २९.०६.२०१८

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्याचे क्रीडा धोरण २०१२ मध्ये शालेय क्रीडा स्पर्धांमध्ये भाग घेणाऱ्या खेळाडूंची निवास व भोजन व्यवस्था, ट्रॅक सूट, गणवेश व क्रीडांगणे तयार करणे इत्यादी बाबीवर होणारा खर्च लक्षात घेता अनुदानाच्या दारात वाढ करण्याची तरतूद आहे.तसेच उपरोक्त संदर्भ क्र.०१ च्या शासन निर्णयान्वये सदर वाढ करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्र.०४ च्या पत्रान्वये सन २०१८-१९ या वर्षामध्ये शालेय क्रीडा स्पर्धाचे आयोजन करण्यासाठी निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. त्या अनुषंगाने या योजनेतंर्गत सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीच्या वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या वर्षा मध्ये शालेय क्रीडा स्पर्धाचे आयोजन करण्यारीता रु.१२००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी रु.८४०.००लक्ष (रुपये आठ कोटी चाळीस लाख फक्त ) इतकी रक्कम वितरित करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "२२०४-क्रीडा व युवक सेवा- १०४ क्रीडा व खेळ (०५) राज्य संघाची प्रतिनीयुक्ती, (०५) (०६)शालेय क्रीडा स्पर्धा आयोजन योजनांतर्गत योजना (२२०४ ५६३५) ३१ सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. शालेय क्रीडा स्पर्धा मध्ये वाढीव अनुदान देण्याबाबत संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयामधील अटी व शर्ती लागू राहतील.

४. वित्त विभाग दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधीत जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.१, २, ३, ४, ५, ६ व ७ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१६१५०३०७६४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.08.18 11:40:18 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा.राज्यपाल तथा अध्यक्ष, आंतरविद्यापीठ क्रीडा महोत्सव आयोजन समिती, मुंबई.

२.मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३.मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१३. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
१४. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१५. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. निवड नस्ती (क्रीयुसे-२).